GR-200407151634080010100

**अपंग व्यक्तींना शासकीय सेवेतील गट-अ ते गट-ड मधील पदांवर सरळसेवेने नियुक्ती देण्यासंदर्भात क्रमवार बिंदू नामावली व कार्यपध्दती विहित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग
शासन परिपत्रक क्र.: एसआरव्ही-१०९९/प्र.क्र.३७/९९/१६-अ
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ४ मार्च, २००२.

संदर्भ :- १) शासन परिपत्रक, सा.प्र.वि. क्र. : एसआरव्ही-१०९७/प्र.क्र.१२/९७/१६-अ, दि.२ मे, १९९८.
२) केंद्र शासनाचे क्र.३६०३५/१६/९१-Estt (SCT) दि. १८.२.१९९७ चे कार्यालयीन ज्ञापन.
३) केंद्र शासनाचे क्र.३६०२५/०३/९७-Estt (Res) दि. ४.७.१९९७ चे कार्यालयीन ज्ञापन.
४) शासन परिपत्रक, सा.प्र.वि. क्र. : एसआरव्ही-१०९७/प्र.क्र.३१/९८/१६-अ, दि. १६ मार्च, १९९९

**शासन परिपत्रक**

अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम, १९९५ च्या कलम ३२ व ३३ नुसार, अपंग व्यक्तींसाठी गट-अ ते गट-ड मधील नियुक्तीकरीता योग्य ठरविलेल्या पदांवर (Identified Posts) सरळ सेवा भरतीमध्ये १)अंध/अल्पदृष्टी (दृष्टीक्षीणता)-१%, २) कर्णबधीर-१%, आणि ३)अस्थिव्यंग किंवा मंदमती-१% असे एकूण ३% आरक्षण ठेवण्याची कार्यपध्दती या विभागाच्या दि.२ मे, १९९८ च्या शासन परिपत्रकात विहित करण्यात आली आहे. त्यानुसार राज्य शासनाच्या प्रत्येक प्रशासकीय विभागाने विभागांतर्गत आणि विभागाच्या अधिपत्याखाली कार्यरत असलेल्या विविध शासकीय कार्यालयांमधील गट-अ ते गट-ड मधील प्रत्येक संवर्गातील कामाच्या स्वरूपाचे काळजीपूर्वक परिशीलन करून अपंग व्यक्तींसाठी सरळसेवा भरतीत रिक्त पदांवर ३% आरक्षण विहित करणे आवश्यक आहे.

२. केंद्र शासनाने त्यांच्या दि.१८ फेब्रुवारी, १९९७ आणि दि.४ जुलै, १९९७ च्या कार्यालयीन ज्ञापनान्वये अपंग व्यक्तींची गट-अ व गट-ब मधील पदांवर सरळ सेवेने भरती करतांना १०० रिक्त पदांची स्वतंत्र नोंदवही ठेवून त्यामधील १, ३४ व ६७ या क्रमानुसार येणारी रिक्त पदे राखून ठेवण्याच्या सूचना देऊन त्याबाबतची कार्यपध्दती विहित केली आहे. राज्य शासकीय / निमशासकीय सेवेत गट-अ ते गट-ड मधील नियुक्तीकरीता योग्य ठरविलेल्या पदांवर (Identified Posts)अपंगांची सरळ सेवेने नियुक्ती करतांना केंद्र शासनाने विहित केलेली क्रमवार बिंदू नामावली व कार्यपध्दती स्वीकारण्याचे शासनाने ठरविले आहे. त्यानुसार खालील सूचना देण्यात येत आहेत.

३. राज्य शासनाच्या सेवेतील गट-अ ते गट-ड मधील अपंग व्यक्तींसाठी योग्य ठरविलेल्या पदांवर (Identified Posts) सरळ सेवेने नियुक्ती करतांना प्रत्येक मंत्रालयीन विभागांनी/त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालयांनी अपंगांसाठी ठेवण्यात आलेले आरक्षण कार्यान्वित करण्यासाठी योग्य ठरविण्यात आलेल्या व सरळ सेवेने भरण्यात यावयाच्या प्रत्येक पदासाठी १०० बिंदूंची स्वतंत्र नोंदवही (Register) ठेवून त्यामधील १, ३४ व ६७ या क्रमाने येणारी रिक्त पदे अपंगांसाठी राखून ठेवावीत. याकरीता विभाग प्रमुखांनी नोंदवहीतील क्रमांक १ पासून सुरुवात करुन कोणत्याही एका अपंग प्रवर्गातील उमेदवारांचा विचार करावा. मात्र असे करताना नियुक्तीस योग्य ठरविलेले पद (Identified Post) एकापेक्षा अनेक अपंग प्रवर्गाकरीता योग्य ठरविलेले असेल तर, आरक्षण ठेवताना ते १) अंध/अल्पदृष्टी,(दृष्टीक्षीणता) २) कर्णबधीर आणि ३)अस्थिव्यंग किंवा मंदमती या क्रमाने आळीपाळीने (by Rotation) आरक्षित राहील याची खातरजमा करावी.त्यानंतर या विभागाच्या शासन परिपत्रक दि.१६.३.१९९९ मधील कार्यपध्दतीनुसार मागणीपत्र पाठवावे.अशा प्रकारे निवड झालेल्या अपंग

उमेदवारास सध्या चालू असलेल्या १०० बिंदू नामावलीत (Roster) त्याच्या प्रवर्गानुसार मागासवर्गीय (उदा. अनुसूचित जाती/अनुसूचित जमाती, इ.)/ खुला प्रवर्ग यानुसार दर्शविण्यात यावे. प्रस्तावित क्रमवार बिंदुनुसार तसेच सामाजिक आरक्षण/खुला प्रवर्ग याप्रमाणे मागणी केलेल्या अपंग प्रवर्गाचा उमेदवार त्या भरती वर्षात उपलब्ध न झाल्यास अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम, १९९५ च्या कलम ३६ नुसार कार्यवाही करावी.

४. हे आदेश शासकीय / निमशासकीय सेवा, सर्व शासकीय मंडळे / महामंडळे, स्थानिक स्वराज्य संस्था, जिल्हा परिषदा, महानगरपालिका, नगरपालिका आणि शासनाच्या अधिपत्याखालील किंवा शासनाने अनुदान दिलेली मंडळे, अनुदानीत संस्था यांना लागू होतील.

५. या सूचना आदेशाच्या दिनांकापासून अंमलात येतील. तथापि, ज्या प्रकरणी नियुक्तीची कार्यवाही चालू असेल त्या प्रकरणांना हे आदेश लागू होणार नाहीत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

द.दा.देशपांडे

(द.दा. देशपांडे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
उपमुख्यमंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री,राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
*प्रबंधक,उच्च न्यायालय,मूळ न्याय शाखा,मुंबई,
*प्रबंधक,उच्च न्यायालय,अपील शाखा,मुंबई,
*प्रबंधक,महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण,मुंबई,
*प्रबंधक,लोकआयुक्त व उप लोकआयुक्त,मुंबई,
*सचिव,महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई,
*सचिव,महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय,विधानभवन,मुंबई,
*सचिव,राज्य निवडणूक आयोग,मुंबई.
सर्व विभागीय आयुक्त,
राज्यातील सर्व महामंडळे आणि उपक्रम यांचे व्यवस्थापकीय संचालक,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व महापालिकांचे आयुक्त,
सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व मुख्याधिकारी, नगर परिषदा/नगरपालिका,
संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय,मंत्रालय,मुंबई
अवर सचिव, सामाजिक न्याय विभाग, मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.
आयुक्त, अपंग कल्याण, ३, चर्च रोड, पुणे.
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालयीन विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने
निवड नस्ती.

* पत्राने.

मच - 1057 (डी) (5000-3-02) दि.
—x—x—